**सहायक पोलीस अधीक्षकांची एक अधिसंख्य पद निर्माण करणेबाबत.**

**<u>परिविक्षाधीन भारतीय पोलीस सेवा अधिकारी - ७१ वी तुकडी</u>**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- आयपीएस - ०३१९ /प्र.क्र.३८४/पोल-१,**

२ रा मजला, मंत्रालय, मादाम कामा रोड, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ०८ जानेवारी, २०२०.

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय समक्रमांक दि.१३.१२.२०१९

२) अपर पोलीस महासंचालक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.प्रशि-२/ परि.भापोसे ७१ RR. Batch - २०१८ / ४९५ / २०१९ / २१६३, दि.०९/१२/२०१९

**<u>शासन निर्णय :-</u>**

भारतीय पोलीस सेवेच्या ७१ व्या तुकडीतील पाच परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना ते महाराष्ट्र राज्यात परिविक्षाधीन म्हणून रुजू झाल्यापासून म्हणजेच दि.११.११.२०१९ ते दि.२३.०५.२०२० (६ महिने १२ दिवस) पर्यंतच्या कालावधीत महाराष्ट्र राज्यात प्रशिक्षण घेण्याकरिता, भारतीय पोलीस सेवेतील कनिष्ठ वेतन श्रेणीतील म्हणजेच पे मॅट्रिक्सच्या स्तर १० या वेतन श्रेणीतील “सहाय्यक पोलीस अधिक्षकाची” पाच अधिसंख्य पदे निर्माण करण्यास, तसेच दि.११.११.२०१९ ते दि.३१.०८.२०२० पर्यंत सदर अधिकाऱ्यांच्या वेतन व भत्ते करीता एकूण रु.३८,५२,२१५/- (रुपये अडतीस लाख बावन्न हजार दोनशे पंधरा फक्त) इतका खर्च करण्यास संदर्भीत वाचा क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

२. आता, भारतीय पोलीस सेवेच्या ७१ व्या तुकडीतील श्री. अर्चित विरेंद्र चांडक हे भापोसे अधिकारी दि.११.११.२०१९ रोजी महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथे प्रशिक्षणासाठी हजर झाले आहेत. यानुषंगाने संदर्भीत वाचा क्र.२ येथे नमूद पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार दि.११.११.२०१९ ते दि.३१.१२.२०१९ या कालावधीकरीता “सहाय्यक पोलीस अधिक्षकाचे” एक अधिसंख्य पद निर्माण करण्यास व सदर पदाच्या वेतन व भत्ते यासाठी येणाऱ्या रु.१,३३,६९२/-(रुपये एक लाख, तेहतीस हजार, सहाशे ब्यान्नव फक्त) इतक्या खर्चास शासन मान्यता देत आहे.

३. उपरोक्त परि.२ मध्ये नमूद वेतन व भत्त्यासाठी होणारा खर्च “२०५५ पोलीस - १०९ (१) जिल्हा पोलीस बल” या उपलेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून वेतन व भत्ते या उद्दीष्टामधून सन २०१९ - २०२० या वर्षीच्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तिय सुधारणा, दिनांक ११ जुलै, २०१२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१०८१७०३१०२१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tushar Vasant Mahajan

Digitally signed by Tushar Vasant Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, serialNumber=1a39cef3c157b9ee6a2abe5779acf233682613f7b9c335d6bf4877267695ceca, cn=Tushar Vasant Mahajan
Date: 2020.01.08 16:48:37 +05'30'

**( तुषार महाजन )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) १ / २, महाराष्ट्र, मुंबई,
३) अपर पोलीस महासंचालक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
४) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
८) सह संचालक (तांत्रिक), लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई (२ प्रती)
९) वित्त विभाग (व्यय -७ / वित्तीय सुधारणा - १), मंत्रालय, मुंबई,
१०) सहाय्यक संचालक, भापोसे कक्ष, गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय, मुंबई,
११) अवर सचिव, कार्यासन बीयुडी- १, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवड नस्ती, पोल-१.